# धन्यवाद, जॅक्सन



निकी और जूड
मराठी : अश्विनी बर्वे



# धन्यवाद, जॅक्सन

निकी और जूड

मराठी : अश्विनी बर्वे

एक शेतकरी होता.

त्याच्या बायकोचे नाव ब्यूटी आणि मुलाचे नाव गुडविल होतं.

त्याच्या जवळ जॅक्सन नावाचा एक म्हातारे गाढव सुद्धा  होते.

रोज सकाळी शेतकरी आपल्या जुन्या गाढवाच्या मजबूत पाठीवर बटाटा, गाजर, मका आणि डांगर ठेवत असे आणि ते बाजारात विकण्यासाठी पहाडावर जात असे. आणि कोणत्याही तक्रारीशिवाय व आरामाशिवाय जॅक्सन पहाडावर चढत असे.



मग, एक दिवस सकाळी
म्हातारे गाढव अर्ध्या रस्त्यातच थांबले
आणि मग ते बिलकुल पुढे गेले नाही.

"काय झालं?" शेतकऱ्याने
विचारलं. पण गाढव बोलू शकत
नव्हतं त्यामुळे त्याने शेतकऱ्याला
काहीच उत्तर दिलं नाही.

मग चिडून शेतकऱ्याने त्याला
मागून धक्का द्यायला सुरुवात केली
आणि म्हटलं, "पुढे हो! पहाड चढ!

पण जॅक्सन जागचा हल्ला नाही.

शेतकऱ्याने जॅक्सनला पुढून ओढण्याचा प्रयत्न केला.

"चल ये!" शेतकऱ्याने गाढवाची खूप स्तुती केली. त्याला भीती होती की जर तो बाजारात उशिरा पोहचला तर ग्राहक घालवून बसेल.

तरी पण जॅक्सन बिलकुल हलला नाही. बिचाऱ्या गाढवाने पूर्ण जीवनभर ओझं वाहिले होते. कोणी कधीही त्याचे आभार मानले नव्हते. तो वर्षानुवर्षे जड ओझं उचलत, डोंगर चढत सामान बाजारात नेत होता.



“मूर्ख गाढव!” शेतकरी ओरडला.

हे ऐकून जॅक्सन जमिनीवर बसला आणि मग भाज्या त्याच्या पाठीवरून खाली पडला आणि  डोंगरावरून गडगडू लागल्या.

शेतकरी आपल्या रागात, हट्टी प्राण्याला मारण्यासाठी काठी शोधू लागला.





"मी दहापर्यंत मोजेन आणि जर तू उठला नाही तर मग या काठीचा प्रसाद तुला देईन." शेतकरी रागावला आणि मग त्याने गाढवाला आपल्या हातात पकडलं आणि मोठी काठी दाखवली.

मग शेतकरी मोजू लागला....

"एक...



दोन ...



तीन...



चार. . .

पाच . . .

सहा ....

सात..."

आपल्या घरातून शेतकऱ्याच्या बायकोने ब्यूटीने, पहाडावर जे काही होत होतं,ते सगळं बघितलं. मग तिने आपला मुलगा गुडविलला म्हटलं.

"बेटा, तू जाऊन वडिलांना थोडी मदत कर.”

“हो, आई," गुडविलने उत्तर दिलं.

"धन्यवाद, बेटा," आई म्हणाली.

मग छोटा मुलगा गुडविल पहाडावर चढला.





"आठ. . .

नऊ ..."

शेतकरी मोजत राहिला.

पण कारण की गाढवाला मोजता येत नव्हतं, म्हणून जॅक्सनवर त्याचा काही असर पडला नाही.

दहापर्यंत मोजल्या नंतर शेतकऱ्याने आपली मोठी काठी उचलली. तो गाढवाला मारणारच होता तेवढ्यात त्याला छोट्या मुलाने हाक मारली, “बाबा! कृपया जॅक्सनला मारू नका!”

म्हातारे गाढव, गुडविलला बघून खूप खुश झाले.

हळूहळू, शेतकऱ्याने आपली काठी खाली नेली. त्याने बघितलं की गुडविल, जॅक्सन जवळ गेला आणि त्याने त्याच्या कानात काहीतरी कुजबुजलं.

त्यानंतर म्हातारे गाढव त्वरित आपल्या पायांवर उभं राहिलं.





शेतकरी हैराण झाला, “या हट्टी प्राण्याला आळसापासून दूर राहण्यासाठी तू त्याला काय सांगितलं?” त्याने आपल्या मुलाला विचारलं.

“आईच्या म्हणण्यानुसार," गुडविलने समजावलं, “ काही खूप छोट्या-छोट्या गोष्टी जशा – ‘कृपया' आणि 'धन्यवाद’ म्हटल्याने जगात एक मोठा बदल होऊ शकतो.

शेतकऱ्याने लाजून आपल्या हातातली काठी फेकून दिली. शेतकऱ्याने कधीही आपल्या म्हाताऱ्या गाढवाला सामान वाहून नेल्याबद्दल धन्यवाद दिले नव्हते.

चुपचाप, शेतकऱ्याने भाज्या गोळा केल्या, त्याच्यातल्या काही त्याने जॅक्सनच्या पाठीवर लादल्या. काही स्वतः उचलल्या.





बाजारात पोहचल्यावर त्यांनी एका सावलीच्या झाडाखाली आपले बटाटे, गाजर, मका आणि डांगर काढून ठेवले. तेव्हा थकलेलं गाढव जवळच्या मैदानात चरत राहिलं.

दिवसाच्या शेवटी, सगळ्या भाज्या विकल्या गेल्या. मग शेतकरी, त्याचा छोटा मुलगा आणि म्हातारे गाढव घराकडे निघाले.

घरी शेतकऱ्याची बायको ब्यूटी, रात्रीच्या जेवणासाठी त्यांची वाट बघत होती.
“पण त्याआधी,” शेतकरी म्हणाला, “जॅक्सनला काही सांगायचं आहे.”

मग शेतकरी आपल्या म्हाताऱ्या गाढवाकडे वळला,त्याने हळूच त्याच्या डोक्यावर थोपटलं आणि त्याच्या कानात कुजबुजला, "धन्यवाद, जॅक्सन."

समाप्त